रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली तालुक्यातील हर्णे येथे नळपाणी पुरवठा योजनेच्या पाणी पुरवठ्यासाठी बांधलेल्या खेम धरणाची दुरुस्ती करणेच्या कामास विशष दुरुस्ती/ विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१९/ (प्र.क्र. ३४/२०१९)/वित्त-३,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२,
दिनांक: १२ फेब्रुवारी, २०२०.

संदर्भ :- १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र जा.क्र. कोंपाविम/तां-८/खेम धरण/३८५०/सन-२०१८, दि.१५/११/२०१८.
२) शासन निर्णय २०१७/५६६/१७/सिंव्य (कामे),दि. ३१/०८/२०१८
३) शासन निर्णय संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.
४) शासन निर्णय, देवदु-२०१५/(८३६/२०१५/सिंव्य(कामे), दि.१७.११.२०१६.
५) मा.मुख्य सचिव कार्यालयाची दि. १३/०६/२०१९ रोजीची टिप्पणी.
६) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांचे अ. शा. पत्र क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.३५/ वित्त-३, दि.०८/०७/२०१९.
७) जलसंपदा विभागाचे अ.शा.पत्र क्र.संकीर्ण-२०१८/४४८/१८/सिंव्य (कामे), दि.०९/०७/२०१९
९) या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक ०८.०७.२०१९ चे पत्र.

प्रस्तावना :-

रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली तालुक्यातील हर्णे येथे बांधण्यात आलेले धरण हे नळपाणी पुरवठा योजनेच्या पाणी पुरवठ्यासाठी महाराष्ट्र जीवन प्रधिकरण विभागामार्फत बांधलेले धरण आहे. सदरचे धरण हे हर्णे ग्रामपंचायतीच्या मालकीचे असून त्याची देखभाल व दुरुस्ती सदर ग्रामपंचायतीकडून करण्यात येते. याकरीता जलसंपदा विभागाकडून कोणताही निधी खर्च केला जात नाही. सदर धरणाच्या भिंतीवर मोठ्या प्रमाणात झाडे उगवून ती धरणाच्या भिंतीत गेल्याने मागील १० वर्षांपासून धरणातून मोठ्या प्रमाणात गळती होत असून धरणाची मजबूती कमी झालेली आहे. त्यामुळे सदर धरणाच्या दुरुस्तीकरीता जलसंपदा विभागाकडील कार्यान्वित असलेल्या योजने अंतर्गत अथवा विशेष बाब म्हणून धरणाच्या दुरुस्तीकरीता तातडीने निधी मंजूर होणेबाबत मा. ना. पर्यावरण मंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी मा. जलसंपदा मंत्री महोदयांना विनंती केली आहे . मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण,जलसंपदा व लाक्षेवि) यांच्या अध्यक्षतेखाली सन २०१८ रोजी च्या पावसाळी अधिवेशन, नागपुर येथे दि.१०/०७/२०१८ रोजी ता.दापोली जि. रत्नागिरी येथील खेम धरणाच्या दुरुस्तीच्या कामाबाबत मा .मंत्री जलसंपदा विभाग यांनी दुरुस्तीकरीता तातडीने निधी मंजूर करण्याच्या सुचना दिल्या आहेत . त्यानुसार या अनुषंगाने संदर्भ क्र .५ ची टिप्पणी व ६ चे

अर्धशासकीय पत्राच्या अनुषंगाने मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांनी मा. मुख्यमंत्री महोदयांना सादर केलेल्या दिनांक १३.०६.२०१९ टिप्पणीवरील मा. मुख्यमंत्री महोदयांच्या निदेशानुसर खेम धरण, मौ. हर्णे, ता. दापोली, जि. रत्नागिरी यांच्या विशेष दुरुस्तीच्या कामास रु. २४५.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्याच्या अधीन राहून सदर कामाकरीता प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली तालुक्यातील हर्णे येथे नळपाणी पुरवठा योजनेच्या पाणीपुरवठ्यासाठी बांधलेल्या खेम धरणाची दुरुस्तीच्या विशेष दुरुस्ती कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत एकूण रु.२,४५,००,६३३/- (रू.दोनशे पंचेचाळीस लक्ष सहाशे तेहत्तीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ व ३ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षांतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीतून मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करावा.

लेखाशिर्ष क्र. २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता
०१, पाणी पुरवठा
१९६, जिल्हा परिषदांना सहाय्य
(०१) ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजना
(०१) पाणी पुरवठा धरणाची विशेष दुरुस्ती.

सदर दुरूस्ती कामाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. माती कामे व गवत झाडे/झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

३. सदर दुरूस्ती कामासाठी आवश्यक गळती प्रतिबंधक उपाययोजनांना सक्षम स्तरावर मंजूरी प्राप्त करून त्यानुसार तांत्रिक मान्यता देण्यात यावी.

४. मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच दुरूस्ती कामाचा खर्च राहील याची खातरजमा करण्याची संपूर्ण जबाबदारी कोकण पाटबंधारे विकास महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

७. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करुन द्यावे.

८. विषयांकित अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहन अंतर व तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

९. खेम धरणाचे दुरूस्ती काम जलसंपदा विभागाच्या कोकण पाटबंधारे विकास महामंडळ , ठाणे या कार्यालयास Deposit Work म्हणून सोपविण्यात यावे व अधिक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी या क्षेत्रिय यंत्रणेकडून दुरूस्तीचे काम युध्दपातळीवर हाती घेण्यात यावे.

१०.खेम धरणाच्या दुरूस्ती कामास आवश्यक निधी जिल्हा परिषद रत्नागिरी मार्फत उपलब्ध करून देण्यात येईल.

११.खेम धरण हे जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखाली नाही. प्रधान सचिव, ग्रामविकास यांनी दि.०८/०७/२०१९ च्या पत्रान्वये खेम धरणाची दुरुस्ती Deposit work म्हणून हाती घेण्याच्या सूचना दिल्या आहेत. त्यानुसार खेम धरणाचा विशेष दुरुस्तीचा खर्च ग्रामविकास विभागाच्या उपलब्ध होणाऱ्या निधीतून समाविष्ट करण्यात यावा..

१२.प्रस्तावित कामाचे अंदाजपत्रक कोकण पाटबंधारे विकास महामंडळाने तयार करुन जलसंपदा विभागामार्फत प्राप्त झाले आहे.

१३.उपरोक्त कामांच्या तांत्रिक बाबींसदर्भातील जबाबदारी कोकण पाटबंधारे विकास महामंडळ व त्यांचे अधिनस्त कार्यालयाची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च हा २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजना (०१) पाणी पुरवठा धरणाची विशेष दुरुस्ती या लेखाशिर्षाखाली व मंजुर अनुदानातून भागवण्यात यावा.

शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/(प्र.क्र.३०/२०१३)/विनियम भाग-२, दि. १७.४.२०१५ मधील भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मध्ये विहित केलेल्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे विभागास प्राप्त अधिकाराच्या अनुषंगाने व जलसंपदा विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४४८/१८ /सिंव्य (कामे) दिनांक ०६.०८.२०१९, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४९/का१४४४ दि. ०९.०८.२०१९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५६/२०१९/व्यय-१५ दि.२९.०८.२०१९ नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१३१२१५४३६३२० असा आहे.. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Govindrao Chandekar

Digitally signed by Vijay Govindrao Chandekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=c4af9d57960c0b17c06d02fa756c6ceed7f4d72aa8975c42ae154baec55f5699, cn=Vijay Govindrao Chandekar
Date: 2020.02.13 15:46:57 +05'30'

( विजय चांदेकर )
शासनाचे अवर सचिव

सोबत : परिशिष्ट-अ

प्रत :-

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद , मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव (ग्राम विकास विभाग) यांचे स्वीय सहायक, ग्रा.वि.विभाग,मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) कार्यकारी संचालक, **कोकण पाटबंधारे विकास** महामंडळ, ठाणे,
१६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश, मुंबई,
१७) अधीक्षक अभियंता, रत्नागिरी **पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी**
१८) कार्यकारी अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे विभाग, **रत्नागिरी**.
१९) अवर सचिव (सिं.व्य. कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन वित्त-३, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१९/(प्र.क्र. ३४/२०१९)/वित्त-३, दि. १२.०२.२०२० चे सहपत्र.

## परिशिष्ट - अ

| अ.क्र. | तपशिल | रक्कम (रू.लक्ष) |
|---|---|---|
| १ | धरणाच्या उत्सर्जित व अनुत्सर्जित भागात आडवी व उभी विंधन विवरे घेऊन त्यामध्ये सिमेंट ग्राऊटिंग करणे | ४८.१५ |
| २ | धरणाच्या उर्ध्व बाजूस व विहीरीस Shortcrete concrete करणे | ६३.२४ |
| ३ | धरण सांडव्यास केमिकल गाऊटिंग करणे | ८८.६० |
| | धरण सांडवा दुरुस्ती, foot bridge, stilling basin repair, Dewatering, coffer dam, insurance , गौण खनिज इ. बाबी. | ४५.०१ |
| | एकूण | २४५.०० |

Vijay Govindrao Chandekar

Digitally signed by Vijay Govindrao Chandekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=c4af9d57960c0b17c06d02fa756c6ceed7f4d72aa8975c42ae154baec55f5699, cn=Vijay Govindrao Chandekar
Date: 2020.02.13 15:47:35 +05'30'

(विजय चांदेकर)
शासनाचे अवर सचिव